दहशतवाद विरोधी पथक, गु.नों.क्र.५/२०१४ मधून उद्भवणा-या न्यायायीन प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्रीमती रोहिणी सॅलीयन यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी- २०१४/प्र.क्र.२८७/पोल-१०**

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१, ३० वा मजला,
कफपरेड, मुंबई-४०० ००५,
तारीख: ९ डिसेंबर, २०१४

**संदर्भ :-** शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी- २०१४/ ए.एस.८६ /डी-चौदा, दिनांक १२.०९.२०१४

**शासन निर्णय :-** दहशतवाद विरोधी पथक पो.ठा.स्था.गु.र.क्र.५/२०१४ या गुन्हयातून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड.श्रीमती रोहिणी सॅलीयन यांची विधी व न्याय विभागाच्या दिनांक १२.९.२०१४ च्या अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आली आहे.

२. प्रस्तुत खटल्यासाठी ॲड.श्रीमती रोहिणी सॅलीयन यांना प्रतिदिनी परिणामकारक सुनावणी फी रुपये २०,०००/- या प्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी फी, किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०१, गुन्हा अन्वेषण व दक्षता (००) (०५) दहशतवाद विरोधी पथक - (२०५५ ०५७१) - २८ व्यावसायिक सेवा या

लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४५६/१४/व्यय-७, दिनांक ३.११.२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०५१४४११९६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Veersinh Muralidhar Patil

Digitally signed by Veersinh Muralidhar Patil
DN: CN = Veersinh Muralidhar Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2014.12.09 15:14:47 +05'30'

**(वी.मु.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. पोलीस महासंचालक ,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक,दहशतवाद विरोधी पथक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
७. विधि व न्याय विभाग (अ- शाखा), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९. ॲड.रोहिणी सॅलीयन, १९ शैला महल, १ ली पास्टा गल्ली, कुलाबा, मुंबई.
१०.निवड नस्ती (पोल-१०).